**सन २०२१-२२ करीता चंद्रपूर जिल्हयातील चिचपल्ली येथे बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र स्थापन करणे (४४१५ ०१९२) निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.७९/फ-९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २२ फेब्रुवारी, २०२२

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. ०३.०२.२०२२
२. संचालक, बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र, चिचपल्ली यांचे पत्र क्र.३ खर्च /वेतन/१०८५/ २०२१-२२, दिनांक ०८.१२.२०२१
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांकित दिनांक ०४.०५.२०२१
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांकित दिनांक ०१.०७.२०२१
५. महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांकित दिनांक ०१.११.२०२१
६. महसूल व वन विभाग, शासन निर्णय समक्रमांकित दिनांक २९.१२.२०२१
७. महसूल व वन विभाग, शासन शुध्दीपत्रक समक्रमांकित दिनांक ०३.०१.२०२२

**प्रस्तावना :-**

सन २०२१-२२ आर्थिक वर्षाकरिता चिचपल्ली (ता.जि.चंद्रपूर) येथे बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र स्थापन करणे (४४१५-०१९२) या लेखाशिर्षाअंतर्गत रु.१०००.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पीत असून, ६० टक्केच्या मर्यादेत **रु.७००.०० लक्ष** इतका निधी अर्थसंकल्पीत केलेला आहे. संदर्भ क्र.३ ते ७ च्या शासन निर्णयान्वये रु.५१६.५४ लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१, चे परिपत्रकान्वये सन २०२१-२२ चे सुधारीत अंदाज निश्चित करण्याची कार्यवाही होईपर्यंतच्या कालावधीसाठी विभागास आवश्यक असणाऱ्या खर्चासाठी निधीची गरज लक्षात घेता महसूली लेख्यातील अनिवार्य व कार्यक्रम खर्चाच्या बाबींची ०१-वेतन या उद्दीष्टासाठी निधी वितरणाची मर्यादा ९५% करण्यात आली असून त्याप्रमाणे निधी बिम्स प्रणालीवर वितरीत करण्यास सहमती देण्यात आली आहे.

सदर योजनेअंतर्गत अर्थसंकल्पित असलेल्या नियतव्ययाच्या अनुषंगाने संचालक, बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र, चिचपल्ली यांचेकडून संदर्भ क्र.२ अन्वये ०१-वेतन करीता रु.२९.०४ लक्ष रकमेचा चालू बाब प्रस्ताव प्राप्त झाला असून अनुदान उपलब्ध करुन देण्यास विनंती केली आहे. त्यानुसार या कामासाठी अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

संचालक, बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र, चिचपल्ली यानी संदर्भ क्र.१ नुसार सादर केलेला प्रस्ताव व वित्त विभागाचे संदर्भ क्र.१ येथील परिपत्रक विचारात घेता, प्रस्तावातंर्गत मागणी लक्षात घेऊन, सन २०२१-२२ करीता चिचपल्ली (ता.जि.चंद्रपूर) येथे बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र स्थापन करणे (४४१५-०१९२) या योजनेमधून संचालक, बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र, चिचपल्ली यांना **०१-वेतन अंतर्गत रु.१३.२४ लक्ष** इतका निधी (४४१५-०१९२) या लेखाशिर्षा अंतर्गत विहीत केलेल्या खालील अटी व शर्तींचे अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे.
२. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.
३. नियंत्रक अधिकाऱ्यांना सूचित करण्यात येते की, एकूण वितरीत केलेल्या/करण्यात येणाऱ्या तरतूदीपेक्षा कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.
४. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळो वेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.
५. संस्थेने आर्थिक वर्ष २०२१-२२ मध्ये मंजूर व वितरीत अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमित ठेवावा.
६. अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी/शर्तीचे पालन करावे.
७. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.
८. संस्थेने मागील वर्षाकरिता त्यांना उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२ नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.
९. उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरीता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.
१०. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक ०३.०२.२०२२ परिपत्रकातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.
११. सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

सदर योजनेवर होणारा खर्च मागणी क्रमांक सी-१०, प्रधान शिर्ष ४४१५, कृषी विषयक संशोधन व शिक्षण यावरील भांडवली खर्च, ०६ वनीकरण, पंचवार्षिक योजना अंतर्गत योजना, राज्य योजना अंतर्गत योजना, (००४) संशोधन (००) (०२) बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र चिचपल्ली (४४१५ ०१९२) या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाचे दिनांक ०६.०४.२०२१, २४.०६.२०२१, १४.१०.२०२१, २१.१०.२०२१, ०३.०१.२०२२, २८.०१.२०२२ व ०३.०२.२०२२ परिपत्रक व शासन निर्णय तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२२२१३३६१६४९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAJENDRA PRAKASH NARWANE

Digitally signed by GAJENDRA PRAKASH NARWANE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=088951d0088e627aa56c9ab088add1677b8ac27d637c5cdf80b730f756dce9e8, cn=GAJENDRA PRAKASH NARWANE
Date: 2022.02.22 13:38:40 +05'30'

**( गजेंद्र नरवणे )**
**उप सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र बांबू विकास मंडळ, नागपूर
४. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), चंद्रपूर.
५. संचालक, बांबू संशोधन व प्रशिक्षण केंद्र, चिचपल्ली, चंद्रपूर
६. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. सह सचिव/उपसचिव,वित्त विभाग (अर्थ-३)/(व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२.
८. उप सचिव, नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२.
९. कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)